**जून ते ऑक्टोबर, २०२१ पर्यंत राज्यातील विविध जिल्हयात अतिवृष्टीमुळे तसेच राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेल्या पूरपरिस्थितीमुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना वाढीव दराने मदत देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५८/म-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०२१

संदर्भ :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.०५.२०१५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/म-३, दिनांक १६.०९.२०२१
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/म-३, दिनांक ०६.१०.२०२१

प्रस्तावना :-

जून ते ऑक्टोबर, २०२१ पर्यंत झालेल्या अतिवृष्टीमुळे तसेच राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेल्या पूरपरिस्थितीमुळे शेतीपिकाचे नुकसान झालेल्या बाधित शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत दि.१३.१०.२०२१ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये चर्चा करण्यात आली. सदर मंत्रिमंडळ बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार प्रस्तुत प्रकरणी शासन आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जून ते ऑक्टोबर, २०२१ पर्यंत झालेल्या अतिवृष्टीमुळे तसेच राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेल्या पूरपरिस्थितीमुळे शेतीपिकांचे नुकसान झालेल्या बाधित शेतकऱ्यांना खालीलप्रमाणे मदत प्रदान करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या दरानुसार (SDRF) प्रचलित दर | मदतीचे वाढीव दर |
|---|---|---|---|
| १ | जिरायत पिकांच्या नुकसानीसाठी | • रू.६८००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • रू. १०,०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत |
| २ | बागायत पिकांच्या नुकसानीसाठी | • रू.१३,५००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • रू. १५,०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत |
| ३. | बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदत | • रू १८०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • रू २५,०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत |

मदतीची रक्कम प्रदान करताना संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या इतर अटी व शर्ती लागू राहतील.

२. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधील विहित निकषाव्यक्तीरिक्त अथवा दरापेक्षा अधिक दराने देण्यात येणाऱ्या मदतीची रक्कम वरील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्याप्रमाणे राज्य शासनाच्या निधीतून त्या त्या लेखाशीर्षाखली खर्च करण्यात यावी.

३. वरील मदतीच्या बाबी व निकषा व्यतिरिक्त इतर बाबींच्या नुकसानीसाठी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये विहित करण्यात आलेले राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे निकष व मदतीचे दर लागू राहतील.

४. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. त्यानंतरच यासाठी निधी वितरीत केलयानंतर रक्कम आहरित करून लाभार्थ्याच्या बँक खात्यामध्ये हस्तांतरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यव्राही पूर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. तसेच लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील केंद्र शासनाच्या ndmis.mha.gov.in या संकेतस्थळावरील प्रणालीमध्ये भरण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक :- ४१५/२०२१/व्यय-९, दिनांक २०.१०.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११०२११८०९३२०२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2021.10.21 18:12:26 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय,मुंबई,
५. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०. निवडनस्ती (म-३).